सार्वजनिक बांधकाम विभागातील विद्युत शाखा स्थापत्य शाखेतील प्रादेशिक विभागाच्या अधिपत्याखाली आणणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्र.ईएसटी २०२२/प्र.क्र.८२/प्रशासन-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०१ एप्रिल, २०२४.

**वाचा :-** सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.०५ फेबुवारी, २०२४.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई अंतर्गत असलेली सर्व मंडळ/विभाग/ उपविभागीय कार्यालये स्थापत्य शाखेतील मुख्य अभियंता यांच्या नियंत्रणाखाली आणण्यास शासन निर्णय दि.०५ फेब्रुवारी, २०२४ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. विद्युत विभागातील मंडळ/विभाग कार्यालयातील कार्यरत अधिकारी यांच्या वार्षिक गोपनीय अहवालाचे मुल्यांकन करण्यासाठी प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी असणे आवश्यक आहे. त्याचबरोबर महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका १९८४ मधील परिशिष्ट ३४ व ४२ नुसार सोपविण्यात आलेल्या कामांसाठी सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांना नियंत्रक अधिकारी नेमणे आवश्यक आहे. तसेच विद्युत कामात सुसुत्रता आणण्याकरीता प्रशासकीय व तांत्रिक कामांसाठी महसूल विभाग निहाय त्या त्या मुख्य अभियंता प्रादेशिक विभागांतर्गत विदयुत शाखेतील मंडळ/विभाग/उप विभागीय कार्यालये आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत असलेली सर्व विद्युत मंडळ/विभाग/उपविभागीय कार्यालये सोबत दर्शविलेल्या **विवरणपत्र-१** नुसार स्थापत्य शाखेतील त्या त्या मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्या नियंत्रणाखाली आणण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच विद्युत विभागातील तांत्रिक कामांसाठी व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका १९८४ मधील परिशिष्ट ३४ व ४२ नुसार सोपविण्यात आलेल्या कामांसाठी सोबत दर्शविलेल्या **विवरणपत्र-१** नुसार संबंधित प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंता यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

२. अधीक्षक अभियंता (विद्युत), दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, छत्रपती संभाजी नगर व अधीक्षक अभियंता (विद्युत), प्रादेशक मंडळ, मुंबई, पुणे, नांदेड, नागपूर खुद्द व त्यांच्या कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांच्या प्रशासकीय व तांत्रिक कामासाठी दैनंदिन अहवाल अधिकारी व प्रतिवेदन अधिकारी म्हणून सोबत

दर्शविलेल्या **विवरणपत्र-२** नुसार अनुक्रमे मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, पुणे, नांदेड, नागपूर व छत्रपती संभाजी नगर यांना घोषित करण्यात येत आहे.

**३.** शासनास सादर करावयाचे सर्व प्रस्ताव (धोरणात्मक, तांत्रिक मान्यता, आस्थापना विषयक सर्व बाबींसंदर्भात प्रस्ताव व इतर प्रस्ताव) यासंदर्भात समन्वयक अधिकारी म्हणून अधीक्षक अभियंता (विद्युत), प्रादेशिक मंडळ, मुंबई यांची नेमणूक करण्यात येत आहे. अधीक्षक अभियंता (विद्युत), प्रादेशिक मंडळ, मुंबई यांनी सर्व विद्युत मंडळ कार्यालयांशी समन्वय साधून विहित मुदतीत प्रस्ताव शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

**४.** शासन निर्णय, दि.०५ फेब्रुवारी, २०२४ अन्वये मुख्य अभियंता (विद्युत) यांच्या कार्यालयीन कामकाजाकरीता मंजूर करण्यात आलेली सर्व पदे मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई अंतर्गत वर्ग करण्यात आली होती. सदर निर्णयात बदल करुन मुख्य अभियंता (विद्युत) यांच्या कार्यालयीन कामकाजाकरीता मंजूर करण्यात आलेली सर्व पदे अधीक्षक अभियंता (विद्युत), प्रादेशिक मंडळ, मुंबई यांना शासनास सादर करावयाच्या सर्व प्रस्तावासाठी / कार्यालयीन कामकाजासाठी तात्पुरत्या स्वरुपात उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४०११६४८२४८८१८ असा आहे.

**६.** सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDEEP SAHADEO
REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.04.01 16:59:18 +05'30'

**( सुदिप सहदेव रेवाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (रस्ते)/सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सर्व सह सचिव /उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/छत्रपती संभाजी नगर/अमरावती/ नागपूर/नांदेड.
६. मुख्य अभियंता (राष्ट्रीय महामार्ग), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई.
७. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे (स्थापत्य /विद्युत) / दक्षता व गुणनियंत्रण मंडळे
८. निवडनस्ती कार्यासन प्रशासन- १

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२२/प्र.क्र.८२/प्रशासन-१
दि.०१ एप्रिल, २०२४ सोबतचे सहपत्र

**विवरणपत्र-१**

| मुख्य अभियंता कार्यालय | मंडळ कार्यालय | विभाग कार्यालय | उप विभाग कार्यालय | |
|---|---|---|---|---|
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई (नियंत्रक अधिकारी) | अ) अधीक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक विद्युत मंडळ | १) कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत विभाग | i) मंत्रालय विद्युत उपविभाग<br>ii) नवीन विधानभवन विद्युत उपविभाग | iii) मलबार टेकडी विद्युत उपविभाग<br>iv) शहर विद्युत उपविभाग |
| | | २) कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत विभाग | i) जे.जे.रुग्णालय विद्युत उपविभाग<br>ii) दादर विद्युत उपविभाग | iii) वरळी विद्युत उपविभाग |
| | | ३) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विद्युत विभाग | i) मुलुंड विद्युत उपविभाग<br>ii)अंधेरी विद्युत उपविभाग | iii) वांद्रे विद्युत उपविभाग<br>iv) महाराष्ट्र सदन नवी दिल्ली उपविभाग |
| | | ४) कार्यकारी अभियंता, प्रकल्प विद्युत विभाग मुंबई | i) आरे विद्युत उपविभाग<br>ii) भोंगा विद्युत उपविभाग | iii) प्रकल्प विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण (नियंत्रक अधिकारी) | अ) अधीक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक विद्युत मंडळ | ५) कार्यकारी अभियंता, ठाणे विद्युत विभाग | i) ठाणे विद्युत उपविभाग<br>ii) कल्याण विद्युत उपविभाग | iii)पालघर विद्युत उपविभाग<br>iv) नवी मुंबई विद्युत उपविभाग |
| | | ६) कार्यकारी अभियंता, रायगड विद्युत विभाग | i) रायगड विद्युत उपविभाग<br>ii) रत्नागिरी विद्युत उपविभाग | iii) सिंधुदुर्ग विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक | अ) अधीक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक विद्युत मंडळ | ७) कार्यकारी अभियंता, नाशिक विद्युत विभाग | i) नाशिक विद्युत उपविभाग<br>ii) अहमदनगर विद्युत उपविभाग | iii) मालेगांव विद्युत उपविभाग |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (नियंत्रक अधिकारी) | | ८) कार्यकारी अभियंता, धुळे विद्युत विभाग | i) धुळे विद्युत उपविभाग<br>ii) जळगांव विद्युत उपविभाग | iii) नंदुरबार विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे (नियंत्रक अधिकारी) | ब) अधीक्षक अभियंता, पुणे प्रादेशिक विद्युत मंडळ | ९) कार्यकारी अभियंता, पुणे विद्युत विभाग | i) पुणे विद्युत उपविभाग क्र.१<br>ii) पुणे विद्युत उपविभाग क्र.२ | iii) ससून विद्युत उपविभाग |
| | | १०) कार्यकारी अभियंता, सोलापूर विद्युत विभाग | i) सोलापूर विद्युत उपविभाग<br>ii) सातारा विद्युत उपविभाग | iii)अकलूज विद्युत उपविभाग |
| | | ११) कार्यकारी अभियंता, कोल्हापूर विद्युत विभाग | i) कोल्हापूर विद्युत उपविभाग क्र.१<br>ii) कोल्हापूर विद्युत उपविभाग क्र.२ | iii) मिरज विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजी नगर (नियंत्रक अधिकारी) | क) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत मंडळ, नांदेड | १२) कार्यकारी अभियंता, छत्रपती संभाजी नगर विद्युत विभाग | i) छत्रपती संभाजी नगर विद्युत उपविभाग क्र.१<br>ii)छत्रपती संभाजी नगर विद्युत उपविभाग क्र.२ | iii) जालना विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड (नियंत्रक अधिकारी) | क) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत मंडळ, नांदेड | १३) कार्यकारी अभियंता, धाराशिव विद्युत विभाग | i)धाराशिव विद्युत उपविभाग<br>ii) बीड विद्युत उपविभाग | iii) लातूर विद्युत उपविभाग |
| | | १४) कार्यकारी अभियंता, नांदेड विद्युत विभाग | i) नांदेड विद्युत उपविभाग<br>ii) परभणी विद्युत उपविभाग | iii) हिंगोली विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर (नियंत्रक अधिकारी) | ड) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत मंडळ, नागपूर | १५) कार्यकारी अभियंता, नागपूर विद्युत विभाग | i) नागपूर विद्युत उपविभाग क्र.१<br>ii) नागपूर विद्युत उपविभाग क्र.२ | iii) वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय विद्युत उपविभाग<br>iv) भंडारा विद्युत उपविभाग<br>v)गोंदिया विद्युत उपविभाग |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | १६) कार्यकारी अभियंता, चंद्रपूर विद्युत विभाग | i) चंद्रपूर विद्युत उपविभाग<br>ii) वर्धा विद्युत उपविभाग | iii) गडचिरोली विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती (नियंत्रक अधिकारी) | ड) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत मंडळ, नागपूर | १७) कार्यकारी अभियंता, अमरावती विद्युत विभाग | i) अमरावती विद्युत उपविभाग<br>ii) बुलढाणा विद्युत उपविभाग | iii) अकोला विद्युत उपविभाग |
| | | १८) कार्यकारी अभियंता, यवतमाळ विद्युत विभाग | i) यवतमाळ विद्युत उपविभाग | ii)वाशिम विद्युत उपविभाग |
| मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजी नगर (नियंत्रक अधिकारी) | इ) अधीक्षक अभियंता (विद्युत), दक्षता व गुण नियंत्रण मंडळ, छत्रपती संभाजी नगर (कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र) | **कक्ष** | **कार्यक्षेत्र** | |
| | | (१९)कार्यकारी अभियंता (१) | १.मुंबई शहर<br>२.मुंबई उपनगर<br>३.ठाणे<br>४.पालघर<br>५.रायगड<br>६.रत्नागिरी<br>७.सिंधुदुर्ग<br>८.नाशिक<br>९.अहमदनगर | १०.धुळे<br>११.नंदुरबार<br>१२.जळगांव<br>१३.पुणे<br>१४.कोल्हापूर<br>१५.सोलापूर<br>१६.सातारा<br>१७.सांगली |
| | | २०)कार्यकारी अभियंता (२) | १.छत्रपती संभाजी नगर<br>२.धाराशिव<br>३.नांदेड<br>४.जालना<br>५.लातूर<br>६.बीड<br>७.परभणी<br>८.हिंगोली<br>९.नागपूर<br>१०.गडचिरोली | ११.गोंदिया<br>१२.भंडारा<br>१३.चंद्रपूर<br>१४.वर्धा<br>१५.अमरावती<br>१६.अकोला<br>१७.यवतमाळ<br>१८.बुलढाणा<br>१९.वाशिम |

सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी-२०२२/प्र.क्र.८२/प्रशासन-१
दि. ०१ एप्रिल, २०२४ सोबतचे सहपत्र

**विवरणपत्र-२**

| अ.क्र. | मुख्य अभियंता कार्यालय | मंडळ कार्यालय |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई<br>(प्रतिवेदन अधिकारी) | अधीक्षक अभियंता, मुंबई प्रादेशिक विद्युत मंडळ |
| २. | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,पुणे<br>(प्रतिवेदन अधिकारी) | अधीक्षक अभियंता, पुणे प्रादेशिक विद्युत मंडळ |
| ३. | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड<br>(प्रतिवेदन अधिकारी) | अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत मंडळ, नांदेड |
| ४. | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर<br>(प्रतिवेदन अधिकारी) | अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत मंडळ, नागपूर |
| ५. | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजी नगर<br>(प्रतिवेदन अधिकारी) | अधीक्षक अभियंता (विद्युत), दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, छत्रपती संभाजी नगर<br>(कार्यक्षेत्र संपूर्ण महाराष्ट्र) |